**सन २०१६-१७ च्या हंगामातील तूरीच्या खरेदीसाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई व दि. विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या. नागपूर यांना रु.५७० कोटीच्या कर्जास शासन हमी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : शाहमी-२०१७/ सपववि /प्र.क्र. ४२ /अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १२ जून, २०१७

<u>वाचा</u> -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५/११/१९९९.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८/४/२००८
३) शासन निर्णय, सहकारी विभाग,क्र.सपस-२०१७/प्र.क्र.७७/२४ स, दि.२७/४/२०१७
४) सरव्यवस्थापक यांचे क्र.अन्नधान्य/आकीखयो/२०१७-१८/२६४ दि.२६/४/२०१७ चे पत्र.
५) शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१७/ सपववि /प्र.क्र. ४२ /अर्थबळ, दि.२८/४/२०१७

**<u>शासन शुध्दीपत्रक</u> :**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१७/ सपववि /प्र.क्र. ४२ /अर्थबळ, दि.२८/४/२०१७ अन्वये सन २०१६-१७ च्या हंगामात उत्पादित अतिरिक्त तूरीच्या खरेदीसाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांना रु.४३५ कोटी व दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या. नागपूर यांना रु.१३५ कोटी (ऋणको) असे एकूण रु.५७० कोटी (अक्षरी रुपये पाचशे सत्तर कोटी) इतके कर्ज राष्ट्रीयकृत बँकेकडून (धनको) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या मान्यतेने उभारण्यासाठी शासन हमी मंजूर करण्यात आली होती. तथापि, सदर प्रकरणी दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्यादित, नागपूर यांनी रु.१३५ कोटी इतके कर्ज घेण्यास असमर्थता दर्शविल्यामुळे तसेच सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर रू.१३५ कोटी इतक्या कर्जाची रक्कम दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या. नागपूर यांचेऐवजी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांना कर्जरूपाने उभारण्यास मान्यता देण्यात येत आहे. अश्या प्रकारे एकूण रु.५७० कोटी (अक्षरी रुपये पाचशे सत्तर कोटी) इतके कर्ज राष्ट्रीयकृत बँकेकडून (धनको) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या मान्यतेने उभारण्यासाठी शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासन हमी खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

२.१ रु.१३५ कोटीची शासन हमीच्या कर्जावरील व्याजाची प्रतिपूर्ती नाफेडकडून करण्यात येईल.

२.२ हमी शुल्काची रक्कम राज्य शासनास अदा करण्यात यावी व त्याची प्रतिपूर्ती नाफेडकडून होईल याची दक्षता महाराष्ट्र सहकारी मार्केटिंग फेडरेशनने घ्यावी.

३.	उपरोक्तच्या अनुषंगाने संदर्भाधिन शासन निर्णय क्रमांक ५ मध्ये दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्यादित, नागपूर या ऐवजी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई असे वाचावे.

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१७/ सपववि /प्र.क्र. ४२ /अर्थबळ, दि.२८/४/२०१७ मधील इतर अटी व शर्ती, या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक २ मधील अटी व शर्तीसह पूर्वी प्रमाणेच लागु राहतील.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०६१२१६५१२६३४०५ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaibhav R Rajeghatge

Digitally signed by Vaibhav R Rajeghatge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f453d869c76bb9b100c9474614e3d97070719ea461f32ccfef10b55651861f13, cn=Vaibhav R Rajeghatge
Date: 2017.06.12 16:48:50 +05'30'

**( वै.रा.राजेघाटगे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
४) प्रबंधक, लोक आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) प्रबंधक, उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
७) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय,मुंबई (५ प्रती)
१०) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ,मुंबई.
११) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई
१२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश,सी.डी.ओ.बॅरेक्स क्र १, योगक्षेमसमोर,वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२०,
१३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ४०० ००४.
१४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,
१५) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०००२५.
१६) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई- २१,

१७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८,

१८) अ.मु.स. ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या., खेतान भवन, ६ वा मजला, १९८ जमशेदजी टाटा रोड, रिट्स हॉटेल समोर, चर्चगेट, मुंबई-२०

२०) दि. विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या. नागपूर

२१) वित्त विभाग (साउ /व्यय-२ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.

२२) कार्यासन अधिकारी-२४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.

२३) राष्ट्रीयकृत बँका, (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत)

२४) निवड नस्ती -अर्थबळ.

***********